**खरीप पणन हंगाम २०१६-१७ मध्ये किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत खरेदी केलेल्या मका या भरडधान्याची जाहिर ई-लिलावाव्दारे विक्री करण्यासाठी केंद्रीय पातळीवर समिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः भधानि-१४१७/प्र.क्र.१९/नापु-२९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २७ मार्च, २०१७

वाचा -

**शासन निर्णय, क्रमांकः खरेदी-१०१६/प्र.क्र.२०५/नापु-२९, दि.१९.१०२०१६**

**प्रस्तावना :-**

खरीप पणन हंगाम २०१६-१७ मध्ये किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत मार्केटिंग फेडरेशन, मुंबई व आदिवासी विकास महामंडळ, नाशिक या दोन अभिकर्ता संस्थामार्फत भरड धान्याची (मका) खालीलप्रमाणे संदर्भाधीन शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे.

| अ.क्र. | अभिकर्ता संस्था | मका (क्विं.मध्ये) |
|---|---|---|
| १ | मार्केटिंग फेडरेशन, मुंबई. | ११६४४९.३५ |
| २. | आदिवासी विकास महामंडळ, नाशिक | ५१४१.४९ |
| **एकूण** | | **१२१५९०.८४** |

२. केंद्र शासनाने वेळोवेळी दिलेल्या निदेशानुसार सदर भरडधान्य (मका) लक्ष निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेकरिता (TPDS) देणे क्रमप्राप्त आहे. त्यानुसार सर्व संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्याकडून सदरहू व्यवस्थेकरिता (TPDS) देण्याबाबत संबंधित जिल्हा पुरवठा अधिकाऱ्यांपैकी जिल्हा पुरवठा अधिकारी, अमरावती व जळगांव ही दोन जिल्हे वगळता उर्वरित जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयांकडून असमर्थता दर्शविण्यात आलेली आहे. सदर भरडधान्याचा टिकाऊपणा निसर्गत: अल्प असल्याने व ते गोदामात पडून राहिल्याने भरडधान्य खराब होते. परिणामत: सदर भरडधान्याच्या नुकसानीची जबाबदारी राज्य शासनावर पडते.सदर भरडधान्य विक्रीविना गोदामात पडून राहिल्याने पुढील खरेदी हंगामातील भरडधान्य गोदामाअभावी त्यास साठवणूक करणे अवघड होते. तरी, जिल्हा पुरवठा अधिकारी, अमरावती व जळगांव वगळता उर्वरित जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयांनी भरडधान्य (मका) लक्ष निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेकरिता (TPDS) देण्याबाबत दर्शविलेली असमर्थता तसेच, केंद्रशासनाने राज्य शासनास दिलेले निर्देश विचारात घेवून, उर्वरित जिल्हयातील खरेदी झालेल्या भरडधान्याची (मका) ई-लिलाव प्रक्रियेव्दारे विक्री करण्याकरिता केंद्रीय पातळीवर समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

३. खरीप पणन हंगाम २०१६-१७ मध्ये किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेतंर्गत मार्केटिंग फेडरेशन, मुंबई व आदिवासी विकास महामंडळ, नाशिक या दोन अभिकर्ता संस्थेमार्फत भरडधान्याची (मक्याची) खरेदी करण्यात आलेली आहे. सदर अभिकर्ता संस्थेमार्फत खरेदी करण्यात आलेला भरडधान्य (मका) अमरावती व जळगांव वगळता उर्वरित जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयांकडून लक्ष निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेकरिता (TPDS) देण्याबाबत असमर्थता दर्शविलेल्या १२ जिल्हयांतील शिल्लक असलेल्या भरडधान्याची (मक्याची) माहिती खालीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | जिल्हयाचे नाव | मका (क्विंटल) |
|---|---|---|
| १ | नागपूर | २१७.०५ |
| २ | उस्मानाबाद | ९१६.०० |
| ३ | धुळे | ७५८५.०० |
| ४ | औरंगाबाद | २३०३४.५० |
| ५ | सांगली | ९.५० |
| ६ | सातारा | ४६९.५० |
| ७ | सोलापूर | ४०५६७.५० |
| ८ | बीड | १४४८.०० |
| ९ | नाशिक | ३७१९७.८० |
| १० | नंदुरबार | ६४६.३० |
| ११ | बुलढाणा | ७८५.५० |
| १२ | अहमदनगर | ४६७१.५० |
| | **एकूण** | **११८३४८.१५** |

४. वरील खरीप पणन हंगामातील उपरोक्त १२ जिल्हयात खरेदी करण्यात आलेला एकूण ११८३४८.१५ क्विंटल भरडधान्याची (मक्याची) ई-लिलावाव्दारे विक्री करण्याकरिता केंद्रीय पातळीवर खालीलप्रमाणे समिती गठित करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

- **नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा -- अध्यक्ष.**
- **उप आयुक्त (पुरवठा), कोकण -- सदस्य.**
- **संबंधित जिल्हयाचे पुरवठा अधिकारी -- सदस्य**
- **वि.स.व उ.स. -- सदस्य सचिव.**

५. उपरोक्त समितीने भरडधान्य (मका) ई-लिलाव प्रक्रियेव्दारे विकण्याची प्रक्रिया केंद्रिय पातळीवर करावी व ती शासन निर्णय निर्गमित झालेल्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत पूर्ण करण्याची दक्षता घ्यावी. सदर भरडधान्याची ई-लिलावाव्दारे विक्री केल्यानंतर प्राप्त होणारी रक्कम

वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई यांच्या स्वीय प्रपंजी लेख्यात (PLA) जमा करावी.

६. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेताक २०१७०३२७१६२०१६७३०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Raju Kalluji Narpande

Digitally signed by Raju Kalluji Narpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=F.C.S and C.P, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c9bb69da44e8b03c93d1a880163547bbb4787f2f2839b6277a288182cbf623cb, cn=Raju Kalluji Narpande
Date: 2017.04.05 12:01:49 +05'30'

**(राजू क.नरपांडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
२. मा.विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधानपरिषद).
३. मा.राज्यमंत्री, (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, (वित्त).
६. प्रधान सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र स्टेट को.ऑप.मार्केटिंग फेडरेशन लि., मुंबई.
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विका महामंडळ, नाशिक.
९. सर्व विभागीय आयुक्त.
१०.नियंत्रक (शिधावाटप) व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
११.सर्व जिल्हाधिकारी.
१२.वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१३.सर्व उप आयुक्त (पुरवठा).
१४.सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी.
१५.कक्ष अधिकारी (नापु-२२)
१६.निवडनस्ती, (ना.पु.२९)